**छत्रपती शाहू महाराज संशोधन, प्रशिक्षण व मानव विकास संस्था (सारथी), पुणे या संस्थेसाठी आर्थिक वर्ष सन २०२४ -२५ करिता निधी वितरीत करण्यास मंजूरी देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**नियोजन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : सारथी २०२४/प्र.क्र.१२४/का.१४२५-अ**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक : **१९ मार्च, २०२५.**

**संदर्भ** :-

१. शासन ज्ञापन क्रमांक: सारथी-२०२४/प्र.क्र.१२४/का-१४२५-अ,दि.०५.०६.२०२४
२. शासन निर्णय क्रमांक: सारथी-२०२३/प्र.क्र.९३/का-१४२५-अ,दि.०५.०७.२०२४
३. शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र.अर्थसं-२०२४/ प्र.क्र.८०/अर्थ-३,दिनांक २५.०७.२०२४
४. शासन ज्ञापन क्रमांक: सारथी-२०२४/प्र.क्र.१२४/का-१४२५-अ,दि.१६.०९.२०२४
५. शासन निर्णय क्रमांक: सारथी-२०२४/प्र.क्र.१२४/का-१४२५-अ,दि.१६.०१.२०२५
६. छत्रपती शाहू महाराज संशोधन, प्रशिक्षण व मानव विकास संस्था (सारथी),पुणे यांचे दिनांक ११.०२.२०२५ व दि.१४.०२.२०२५ रोजीचे पत्र.

**शासन निर्णय** :-

छत्रपती शाहू महाराज संशोधन, प्रशिक्षण व मानव विकास संस्था (सारथी), पुणे या कंपनीस सन २०२४-२५ या आर्थिक वर्षाकरिता "ओ-०२, २२२५, अनुसूचीत जाती, अनुसूचीत जमाती, इतर मागासवर्ग व अल्पसंख्याक यांचे कल्याण, ०३, मागासवर्गीयाचे कल्याण, १०२, आर्थिक विकास (०१) मराठा, कुणबी, कुणबी मराठा, मराठा कुणबी यांचे कल्याण (०१)(०१) छत्रपती शाहू महाराज संशोधन प्रशिक्षण व मानव विकास संस्था (सारथी) (कार्यक्रम) (२२२५एफ ५२१)" या लेखाशिर्षांतर्गत संदर्भ क्र.१ च्या शासन निर्णयान्वये रु.२८५.५७ लक्ष निधी वितरीत करण्यात आला आहे. संदर्भ क्र. २ अन्वये ३५-भांडवली मत्ता उद्दिष्टाखाली रु.४५.६६ कोटी इतका निधी वितरीत करण्यात आला आहे. संदर्भ क्र.४ च्या ज्ञापनान्वये रु.४९.७८ कोटी इतका निधी वितरीत करण्यात आला आहे. तर संदर्भ क्र.५ अन्वये रु.८१.५७ कोटी इतका निधी वितरीत करण्यात आला आहे.

२. छत्रपती शाहू महाराज संशोधन प्रशिक्षण व मानव विकास संस्था (सारथी), पुणे यांनी संदर्भ क्र.६ अन्वये मागणी केल्यानुसार खालीलप्रमाणे उद्दिष्टनिहाय अनुदान वितरीत करण्यात येत आहे.

**(रुपये कोटीत)**

| **अ.क्र.** | **उद्दिष्ट** | **अर्थसंकल्पित अनुदान** | **यापूर्वी वितरीत अनुदान** | **या आदेशान्वये वितरीत अनुदान** |
|---|---|---|---|---|
| १ | १०-कंत्राटी सेवा | ६.०० | ४.६२ | ०.७८ |
| २ | ३१-सहायक अनुदाने (वेतनेतर) | १५०.४० | ९०.२४ | १५.०४ |
| ३ | ३५-भांडवली मत्तेच्या निर्मितीसाठी अनुदान | १३७.०० | ८२.२० | १३.७० |
| ४ | ३६-सहायक अनुदान (वेतन) | ६.५० | ५.५२ | ०.३३ |
| | | | एकूण | २९.८५ |
| अक्षरी रूपये एकोणतीस कोटी पंच्याऐंशी लाख फक्त | | | | |

३. छत्रपती शाहू महाराज संशोधन, प्रशिक्षण व मानव विकास संस्था (सारथी), पुणे या संस्थेसाठी सन २०२४ -२५ करिता उपरोक्त एकूण रुपये २९.८५ कोटी (अक्षरी रूपये एकोणतीस कोटी पंच्याऐंशी लाख फक्त) इतका निधी कोषागार कार्यालय यांना आहरित करण्यापूर्वी तसेच खर्च करताना राज्य शासनाची कार्यनियमावली, वित्तीय नियमावली, अर्थसंकल्पिय नियम पुस्तिकेतील तरतुदी व सर्व अटी व शर्तीनुसार सदर निधी खर्च करताना, कोणतीही वित्तीय अनियमितता होणार नाही याची दक्षता घेण्याची, तसेच सदर खर्च केल्यानंतर उपयोगिता प्रमाणपत्र वेळोवेळी शासनास व संबंधितांना सादर करण्याची जबाबदारी ही व्यवस्थापकीय संचालक, छत्रपती शाहू महाराज संशोधन, प्रशिक्षण व मानव विकास संस्था (सारथी), पुणे यांची राहील.

४. सदर निधी खर्च करण्यासाठी नियंत्रक अधिकारी म्हणून व्यवस्थापकीय संचालक, छत्रपती शाहू महाराज संशोधन, प्रशिक्षण व मानव विकास संस्था (सारथी), पुणे तसेच आहरण संवितरण अधिकारी म्हणून मुख्य लेखा व वित्त अधिकारी, छत्रपती शाहू महाराज संशोधन, प्रशिक्षण व मानव विकास संस्था (सारथी), पुणे यांना घोषित करण्यात येत आहे.

५.  छत्रपती शाहू महाराज संशोधन, प्रशिक्षण व मानव विकास संस्था (सारथी), पुणे या कंपनीसाठी उपरोक्त बाबींसाठी होणारा खर्च हा सन २०२४-२५ साठीच्या असलेल्या उपरोक्त लेखाशीर्षाखालील मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

६.  सदरहू मंजूर करण्यात आलेल्या अनुदानाची संबंधित कोषागारातून काढण्यात आलेली रक्कम महालेखापाल कार्यालयातील लेख्यात त्याच शीर्षाखाली नोंदली केली आहे किंवा नाही याची खात्री करुन घ्यावी.

सदरचा शासन निर्णय हा वित्त विभागाचा अनौपचारीक संदर्भ क्र. १२८/२०२५/व्यय-८ दिनांक २०/०२/२०२५ अन्वये दिलेल्या मान्यतेनुसार तसेच वित्त विभागाच्या शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०२४/प्र.क्र.८०/अर्थ-३ दिनांक २५.०७.२०२४ च्या तरतुदीच्या अधीन राहून निर्गमित करण्यात येत आहे.

७.  सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्र. २०२५०३१९१२५४०६७६१६ असा आहे. सदर शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

VIVEK BANSI GAIKWAD

Digitally signed by VIVEK BANSI GAIKWAD
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PLANNING DEPARTMENT, 2.5.4.20=2dcd8a369b90c95da2ba1482ac5185a9b5d5d8a62596d71411bc96a1a7d9bad5, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=1ECC1A130CD0429F39A57C63D4B57C6C3ACFCA13C103BFF9F5EF5D51BD17AD08, cn=VIVEK BANSI GAIKWAD
Date: 2025.03.19 12:55:33 +05'30'

**(विवेक ब.गायकवाड)** (भा.प्र.से.)

**सह सचिव ,महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.राज्यपाल, महाराष्ट्र राज्य यांचे प्रधान सचिव.
२. मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय,मुंबई
३. मा.उपमुख्यमंत्री यांचे (नियोजन) यांचे प्रधान सचिव, मंत्रालय,मुंबई
४. अपर मुख्य सचिव यांचे वरिष्ठ स्वीय सहाय्यक, नियोजन विभाग,मंत्रालय,मुंबई.
५. अपर मुख्य सचिव यांचे वरिष्ठ स्वीय सहायक, वित्त विभाग,मंत्रालय,मुंबई
६. प्रधान महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरीक्षा),महाराष्ट्र-१/२,मुंबई/नागपुर
७. व्यवस्थापकीय संचालक, छत्रपती शाहू महाराज संशोधन, प्रशिक्षण व मानव विकास संस्था (सारथी), पुणे
८. उप सचिव ,वित्त विभाग कार्यासन व्यय-८/अर्थ-३/अर्थ-१६
९. अधिदान व लेखा अधिकारी,मुंबई
१०. निवासी लेखापरिक्षा अधिकारी,मुंबई
११. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे
१२. वरिष्ठ कोषागार अधिकारी,पुणे
१३. कार्यासन १४२४, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१४. निवडनस्ती कार्यासन १४२५-अ